**"अधिकार अभिलेखातून प्राप्त होणाऱ्या नक्कल फी जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या स्वीय प्रपंजी लेखा खात्यामध्ये जमा करणे व त्यामधून विविध बाबींसाठी खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत."**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०१८/प्र.क्र.२०९./ल-१**
पहिला मजला, मुख्य इमारत, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक : ०२ जुलै, २०२०

**वाचावे :-**

१) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१८/प्र.क्र.२०९/ल-१, दि.२६.०३.२०१९
२) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेकडील पत्र क्रमांक राभूअआका-१/स्विग्रले/खर्चाच्या बाबी/२०२० दि. २७.०५.२०२०.
३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्रमांक संकिर्ण-२०१९/प्र.क्र.८३/ल-१, दि.१९.०९.२०१९
४) महालेखापाल-२, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या No.TM/Gr.IIII/PLA/Settelment Commissioner, Pune/UoR-१५/११३८, दि. १७.०२.२०२०
५) महालेखापाल-२, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या No.TM/Gr.IIII/PLA/Settelment Commissioner, Pune/UoR-१५/९५, दि. २६.०६.२०२०

**प्रस्तावना :-**

राज्यात डिजीटल इंडिया लँड रेकॉर्ड मॉडर्नायझेशन कार्यक्रमातंर्गत जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या कार्यालयाकडून संगणकीय गा.न.नं. ७/१२, ८ अ, ई-फेरफार, ई-अभिलेख प्रकल्पांची आज्ञावली विकसित करण्यात आलेल्या आहेत. त्याचप्रमाणे भविष्यात ई अभिलेख, ई भू-नकाशा, ई फेरफार अशा प्रकारच्या प्रकल्पांच्या आज्ञावली विकसित करण्यात येणार आहेत. या प्रणालीव्दारे वितरीत होणाऱ्या अधिकार अभिलेखाच्या नक्कल फी मधून प्राप्त होणारी एकूण रकमेतून जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या हिस्याची रक्कम जमा करण्यासाठी तसेच विकसित करण्यात आलेल्या/करण्यात येणाऱ्या ऑनलाईन प्रणालीच्या देखभाल, दुरुस्ती, तांत्रीक सहाय्य व दुरूस्तीसाठी येणाऱ्या खर्चासाठी व अन्य खर्चासाठी वाचा क्र.१ अन्वये जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या कार्यालयात नविन स्वीय प्रपंजी लेखा उघडण्यास मान्यता देण्यात आली आहे. परंतु सदर शासन निर्णयामध्ये संगणकीय डिजीटाईज्ड साईनचे गा.न.नं. ७/१२, ई-फेरफार व ८ अ या अधिकार अभिलेखाच्या वितरणामधून प्राप्त होणारी रक्कम जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या कार्यालयात उघडण्यात आलेल्या नवीन स्वीय प्रपंजी लेखा खाते यामध्ये जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि

अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा हिस्सा जमा करण्यास मान्यता देण्यात आली आहे. त्याचप्रमाणे वित्तीय वर्षात स्वीय प्रपंजी लेखा खात्यामध्ये रूपये १५ कोटीपर्यत जमा करण्याची मर्यादा देण्यात आली आहे. परंतु भविष्यात विकसित होणाऱ्या ई-रेकॉर्ड ॲप्लीकेशन, डिजीटाईज्ड नकाशे, संगणकीय अधिकार अभिलेख, इत्यादी सर्व प्रणालीमधून प्राप्त होणाऱ्या एकूण नक्कल फी रकमेतून जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या हिस्याची रक्कम जमा करण्यासाठी तसेच जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे विकसित करण्यात आलेल्या/करण्यात येणाऱ्या सर्व ऑनलाईन प्रणालीच्या देखभाल, दुरूस्ती, तांत्रीक सहाय्य व दुरूस्तीसाठी येणाऱ्या खर्चासाठी व अन्य खर्चाच्या बाबीस यापूर्वी मान्यता देण्यात आलेली नाही. या बाबी विचारात घेता नव्याने विकसित करण्यात आलेल्या अज्ञावलीमधून वितरीत होणाऱ्या नक्कलांच्या नक्कल फी मधून प्राप्त होणाऱ्या एकूण रकमेपैकी जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या हिस्याची रक्कम स्वीय प्रपंजी लेखा खाते यामध्ये जमा करण्यास, तसेच त्यामधून करण्यात येणाऱ्या विविध खर्चाच्या बाबीस व स्विय प्रपंजी लेखा खात्यात वित्तीय वर्षातील वित्तीय मर्यादा वाढविण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

महाभूमि प्रकल्प व्यवस्थापन संस्थेला बळकटी देण्यासाठी भूमी अभिलेख व जमीन व्यवस्थापनाच्या ऑनलाईन प्रणाली विकसित करणेसाठी व देखभाल दुरूस्तीसाठी जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या नावे वाचावे येथे अनुक्रमांक १ अन्वये उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी लेखा खात्यामध्ये रूपये १५ कोटीपर्यत जमा करण्याची मर्यादा वाढविण्यात येवून ती रूपये ३० कोटी पर्यंत वाढविण्यास तसेच जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे याच्या कार्यालयाकडून विकसित करण्यात आलेल्या सर्व आज्ञावली जसे की, ई-रेकॉर्ड ॲप्लीकेशन, डिजीटाईज्ड नकाशे, संगणकीय अधिकार अभिलेख, इत्यादीच्या संगणकीय नक्कल फी मधून प्राप्त होणाऱ्या एकूण रकमेतून जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या हिस्याची रक्कम जमा करण्यासाठी व विविध बाबींसाठी खर्च करण्यास वाचावे अनुक्रमांक ४ व ५ अन्वये महालेखापाल, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी खाली नमूद केलेल्या अटींच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

(i) Out of the total revenue received through issue of digitally signed copies of 7/12 utara (extract), e-Mutation and 8A as per the E-Mutation Program only the share of Settlement Commissioner, Pune shall be credited into this PLA. Also, the revenue received from distribution of copies of archived records from e-records application, digitized maps and computerized property cards shall be credited into this Personal Ledger Account.

(ii) In no circumstances, this PLA shall receive any credit by debiting the consolidated fund of the state.

(iii) The maximum amount in the PLA shall not exceed Rs. 30/- Crore at any given time in a Financial Year. Any amount exceeding this threshold shall be remitted to the corresponding service head of the consolidated fund at once. This shall be watched by the Revenues Sharing Authority, Administrator of PLA and the concerned Treasury Officer.

(iv) The balance at credit in the PLA at the end of each financial year shall be credited to the Government Account on 31st March of same financial year. This shall be watched carefully by the concerned treasury officer.

(v) The fund shall be withdrawn from this Personal Ledger Account only for the following activities

| | |
|---|---|
| **Sr. No.1** | **General activities** |
| | (a) Software development/procurement and Website development including Maintenance, Support, Security audit and Technical support. |
| | (b) Computers/Accessories/SMS-email Gateway/IT Hardware purchases/ Cloud-Data Centre hosting and reimbursement of recurring operational expenses |
| | (c) Creation and maintenance expenses for networking/connectivity including data card connectivity |
| | (d) Training/Workshop/Publicity and related activities including travel expenses |
| **Sr. No.2** | **Survey and Land Records related activities** |
| | (a) Any Record preservation activities likes Scanning and Digitization of land records and maps and installation of Compactors |
| | (b) Any Survey related activities and equipment’s purchases |

(vi) A fresh concurrence shall be sought for any change in the purpose of deposit of funds into the PLA and withdrawals of the funds therefrom.

(vii) As per the revised provision of Rule 495 vide GF dated 21/01/2014, if the PLA is not operated for more than one complete accounting year, it shall be closed by Treasury Officer without waiting for the proposal from Administrator.

(viii) The Administrator shall be responsible for reconciliation with the Treasury/Sub Treasury.

(ix) All provisions of Accounting Rules for Treasuries 1992 and all provisions of PLA in view of MTR 1968 Vol.-I shall apply to this PLA.

(x) The Administrator should ensure to proper maintenance of Account.

(xi) The PLA shall be subject to Audit as per rule.

The condition stated by the Finance Department to maintain the PLA operational may be ensured by the concerned Office.

२. संगणकीय अधिकार अभिलेखाच्या नक्कलांच्या नक्कल फी मधून प्राप्त होणाऱ्या एकूण रकमेतून जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या हीस्याची रक्कम व्यवस्थापन प्रणाली (Online Accounting System) मधून प्राप्त अहवाला प्रमाणे प्रत्येक मागील सप्ताहात जमा झालेली सदर रक्कम ही पुढील सप्ताहाच्या पहिल्या कामाच्या दिवशी जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे याच्या नावे उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी लेखा खात्यामध्ये जमा करण्यात यावी. तसेच शासनाचा हिस्स्याची रक्कम व्यवस्थापन प्रणाली (Online Accounting System) मधून प्राप्त अहवाला प्रमाणे GRAS प्रणालीव्दारे वाचा क्रमांक ३ अन्वये मान्यता देण्यात आलेल्या लेखा शीर्षाखाली जमा करणे आवश्यक राहील.

३. वाचा क्रमांक १ मधील क्रमांक ४, ५ व ७ वर नमूद करण्यात आलेल्या अटींचे पालन करणे जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना बंधन कारक राहील.

४. वाचा क्रमांक १ अन्वये उघडण्यात आलेल्या स्विय प्रपंची लेखा खात्यामध्ये जमा रकमेतून खर्च करण्याच्या खालीलप्रमाणे नमूद केलेल्या वित्तीय मर्यादा देण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

(अ) डिजीटल इंडिया भूमी अभिलेख आधूनिकीकरण कार्यक्रमांतर्गत असणाऱ्या प्रकल्पासाठी प्रती प्रस्ताव रक्कम रु.०१.०० कोटी रकमेपर्यंत शासनाच्या पूर्व मान्यतेशिवाय खर्चाचे/मंजूरीचे अधिकार जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना असतील.

(आ) डिजीटल इंडिया भूमी अभिलेख आधूनिकीकरण कार्यक्रमांतर्गत असणाऱ्या प्रकल्पासाठी प्रती प्रस्ताव रक्कम रु.०१.०० कोटी रकमेवरील खर्चाचे/मंजूरीचे अधिकार शासनास असतील.

(टिप- माहिती व तंत्रज्ञान बाबीवरील खर्चासाठी नियमानुसार प्रकल्प अंमलबजावणी समिती व उच्चाधिकारी समिती यांची मान्यता घेणे आवश्यक राहील.)

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १७९/२०/कोषा प्रशा-५, दि.२३.०६.२०२० व माहालेखापाल-२, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या No.TM/Gr.IIII/PLA/Settelment Commissioner, Pune/UoR-१५/११३८, दि. १७.०२.२०२० व No.TM/Gr.IIII/PLA/Settelment Commissioner, Pune/UoR-१५/९५, दि. २६.०६.२०२० अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००७०२११४३२८१९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Santosh Haridasrao Bhogle

Digitally signed by Santosh Haridasrao Bhogle
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cfe36679ae12922422bc5e7f7d277841f1fe67725f465c272fd6727259260b3d, cn=Santosh Haridasrao Bhogle
Date: 2020.07.02 12:05:09 +05'30'

**(डॉ.संतोष भोगले)**
**सह सचिव**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२

३. सर्व मा. मंत्री/ मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०००३२
४. मा. अध्यक्ष, विधानसभा यांचे खाजगी सचिव, विधान भवान, मुंबई
५. मा. सभापती, विधानपरिषद यांचे खाजगी सविच, विधान भवन, मुंबई
६. मा. उपाध्यक्ष, विधानसभा यांचे खासगी सचिव, विधान भवन, मुंबई
७. उपसभापती, विधावपरिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
८. मा. विरोधी पक्षनेता (विधानपरिषद) यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
९. मा. विरोधी पक्षनेता (विधानसभा) यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई
१०. मा.मुख्य सचिव , महाराष्ट्र शासन,मंत्रालय, मुंबई
११. अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई
१२. अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग), मंत्रालय, मुंबई
१३. जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४. महालेखापाल ½ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
१५. महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा) मुंबई
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७. निवासी लेखा परिक्षण अधिकारी, मुंबई
१८. निवड नस्ती